20150423152800762 7

(२८८)

चिवेली खारभूमी योजना ता.चिपळूण, जि.रत्नागिरी या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

### जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(५७१/२०१०) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :-२० /०७/२०११

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/चिवेली/तां-२(१) ७९४०, दि.३/११/२०१०

**प्रस्तावना :-**

चिवेली खारभूमी योजना ता.चिपळूण, जि.रत्नागिरी, सदर खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट असून केंद्रीय पर्यावरण वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. सदर योजनेची एकूण लांबी १७६५ मी. असून त्यावर सा.क्र.२१० मी., ९३७ मी.,१३२५ मी. १६७५ मी. वर चार उघाडींचा समावेश आहे. सदर योजना चिपळूण तालुक्यातील वाशिष्ठ नदी वर समुद्रापासून २५ कि.मी. अंतरावर आहे. समुद्रास येणा-या दैनंदिन भरती-ओहोटी व अधूनमधून येणारे मोठमोठी उधाणे व अधूनमधून पावसाळयात होणारी अतिवृष्टी यामुळे बांध व उघाडया नादुरुस्त झाले असून योजनेच्या संरक्षित क्षेत्रात मोठया प्रमाणावर खाजण झालेले असल्यामुळे शेतक यांचे मोठे नुकसान होत आहे. यासाठी ही योजना होणे अत्यंत गरजेचे आहे. ही योजना तातडीने हाती घेण्याबाबत मा.सरपंच चिवेली यांचेकडून वारंवार मागणी होत आहे. याचबरोबर स्थानिक लाभार्थींची मागणी आहे. त्यामुळे सदर योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये चिवेली खारभूमी योजना ता.चिपळूण, जि.रत्नागिरी या योजनेस सन २००८-०९ व सा.बां.वि. दरसूची २००९-१० या वर्षाच्या दरसूचीवर आधारित या योजनेस अंदाजित रु.४५,९३,८००/- (रुपये पंचेचाळीस लक्ष, त्रानव हजार, आठशे फक्त) एवढया रकमेस प्रशासकीय

मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीत्त विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/०६ विनियम दिनांक १३/०३/२००७ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (४९/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
अर्थशाखा १/२(२ प्रती), जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

D:\2011\MOHITE\suprama gr\New Microsoft Word Document.doc

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(५७१/२०१०) खारभूमी दिनांक /०७/२०११ चे सहपत्र
चिवेली खारभूमी योजना ता.चिपळूण, जि.रत्नागिरी, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रूपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | ५०००.०० |
| २ | 'बी' भूसंपादन | ०.०० |
| ३ | 'सी' मुख्य कामे | ३३,९१,२२३.०० |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | ७,३०,९४६.०० |
| ५ | 'के' इमारती | ०.०० |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | ०.०० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | ३८,७५०.०० |
| ८ | 'पी' देखभाल | १०,२६३.०० |
| ९ | 'आर' दळणवळण | ०.०० |
| | एकूण | ४१,७६,१८२.०० |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | ४,१७,६१८.०० |
| | एकूण | ४५,९३,८००.०० |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | ४३.८२ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | १०४५९४.०० |
| लाभव्यय गुणोत्तर | २.८४ |